**दुष्काळग्रस्त तालुक्यातील गोशाळांमध्ये पशुधनाकरीता राहत व चारा शिबीर (कॅटल रिलीफ ॲण्ड फॉडर कॅम्प) सुरू करण्याच्या प्रयोजनार्थ पशुसंवर्धन विभागास रूपये १०.०० कोटी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०१९

**वाचा :-** १. महसूल व वन विभागाचा शासन निर्णय क्र.एससीवाय-२०१८ / प्र.क्र.८९ / म-७, दि. ३१.१०.२०१८.
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पविआ-१०१९/प्र.क्र.१७/पदुम-३, दि. ९.१. २०१९

**प्रस्तावना -**

सन २०१८ च्या खरीप मोसमात राज्यातील बहुतांश जिल्ह्यांमध्ये सरासरीपेक्षा कमी पर्जन्यमान झालेले असल्याने, शासनाने वाचा- १ येथे नमुद शासन निर्णयान्वये राज्यातील २६ जिल्ह्यांमधील १५१ तालुक्यात, दुष्काळ घोषित केला आहे.

राज्यात दुष्काळी परिस्थितीमुळे त्या भागातील पशुधनासाठी आवश्यक असणारा चारा व पाणी उपलब्धतेबाबतचा गंभीर प्रश्न नजीकच्या कालावधीत निर्माण होण्याची शक्यता असल्याने, दुष्काळग्रस्त भागातील जनावरांना आवश्यक असलेल्या चाऱ्याच्या प्रश्नावर मात करण्यासाठी करावयाच्या उपाययोजना संदर्भात दि. ३ जानेवारी, २०१९ रोजी पार पडलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीच्या बैठकीत राज्यात सुरू असलेल्या गोरक्षण सस्थांमध्ये चारा छावण्या सुरू करून इच्छुक शेतक-यांनी त्यांची जनावरे ठेवण्यास आवाहन करावे. त्यानुसार इच्छूक शेतक-यांनी त्यांची जनावरे अशा गोरक्षण संस्थामध्ये ठेवल्यास अशा संस्थेस प्रचलित नियमानुसार SDRF अंतर्गत विहित केलेल्या दराप्रमाणे अनुदान देण्यात यावे. त्यासाठी पदुम विभागाने आवश्यक रकमेची मागणी मदत व पुनर्वसन विभागाकडे करावी. असा निर्णय घेण्यात येऊन औरंगाबाद, उस्मानाबाद, जालना, बीड व परभणी या पाच ठिकाणी गोरक्षण संस्थामध्ये चारा छावण्या सुरू करण्याबाबत विचार करण्यात यावा असे ठरले.

त्यानुसार पशुसंवर्धन विभागाच्या वाचा-२ येथे नमूद शासन निर्णयान्वये मराठवाड्यातील उस्मानाबाद, जालना, बीड, परभणी व औरंगाबाद या ५ दुष्काळग्रस्त जिल्ह्यामध्ये गोवर्धन गोवंश सेवा केंद्र या योजनेंतर्गत ज्या गोशाळांना रूपये. १.०० कोटीचे अनुदानासाठी निवड करण्यात आलेली आहे किंवा अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे, अशा गोशाळांमध्ये प्रायोगिक तत्वावर त्या परिसरातील पशुधनासाठी पशुधन राहत व चारा शिबीर (कॅटल रिलीफ ॲण्ड फॉडर कॅम्प) उस्मानाबाद, जालना, बीड, परभणी व औरंगाबाद या ५ जिल्ह्यातील ६ गोशाळेमध्ये सुरू करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर निर्णयानुसार या ६ गोशाळांसाठी पशुसंवर्धन विभागास प्रथम टप्प्यात रूपये १०.०० कोटी निधी उपलब्ध करून देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उस्मानाबाद, जालना, बीड, परभणी व औरंगाबाद या ५ जिल्ह्यातील ६ गोशाळेमध्ये पशुसंवर्धन विभागाकडून सुरू करण्यात आलेल्या पशुधन राहत व चारा शिबीर (कॅटल रिलीफ ॲण्ड फॉडर कॅम्प) या प्रयोजनासाठी पशुसंवर्धन विभागास रूपये १०.०० कोटी निधी मदत व पुनर्वसन विभागाकडून उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. पशुधन राहत व चारा शिबीर (कॅटल रिलीफ ॲण्ड फॉडर कॅम्प) बाबत महसुल व वन विभाग, शासन निर्णय दिनांक २५.०१.२०१९ मधील शासन निर्णयात विहित केलेल्या दराने अनुदान देण्यात यावे. उपलब्ध करून देण्यात आलेला निधी याच प्रयोजनासाठी खर्च करावा व ३१ मार्च २०१९ नंतर या निधीचे खर्चाचे लेखे या विभागास उपलब्ध करून द्यावेत. दिनांक ३१ मार्च, २०१९ पर्यंत संपूर्ण रक्कम खर्च होणार नसल्यास विहित कालावधीत खर्च होवू न शकणारी तरतूद या विभागास समर्पित करावी.

३. यासाठी येणारा खर्च "२२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०१ अवर्षण-१०१ अनुग्रह सहाय्य (९१) राज्य आपत्ति प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०३) जनावरांच्या छावण्यांमध्ये चारा, पाणी, औषध यांचा पुरवठा व छावण्यापर्यंत वाहतुकीचा खर्च (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ ००७५) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा. सदरहू खर्च २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९०२१४१४४२०५३९१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2019.02.14 14:46:00 +05'30'

**( सु. ह.उमराणीकर )**
**उप सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य
४. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव, (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे
९. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, पुणे
१०. विभागीय आयुक्त (सर्व)
११. जिल्हाधिकारी (सर्व)
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व)
१४. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त (सर्व)
१५. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी (सर्व)
१६. गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
१७. वित्तिय सल्लागार व सहसचिव, मदत व पुनर्वसन, नवीन प्रशासकीय भवन,मुंबई
१८. मा.मंत्री (मदत व पूनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१९. मा. राज्यमंत्री (मदत व पूनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२०. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२१. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२२. मदत व पुनर्वसन विभागातील कार्यासने (क्रमांक ३ /११ /आव्यप्र-१)
२१. निवड नस्ती, म-७.